राज्यातील शहरी भागासाठी संचालक, आरोग्य सेवा (शहरी) व इतर नवीन पदांची निर्मिती करण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय, क्रमांकः पदनि- २०२०/प्र.क्र.१४३/आरोग्य ३**
१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल इमारत,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई - ४०० ००१.
दिनांक : १५ सप्टेंबर, २०२०.

**प्रस्तावना :**

भारत सरकारने १९८३ साली राष्ट्रीय आरोग्य धोरण जाहीर केले. त्यानुसार महाराष्ट्र राज्याने संपूर्ण ग्रामीण भागात आरोग्य संस्था निर्माण केल्या आहेत. आदिवासी व डोंगराळ भागात २०,००० लोकसंख्येस १ प्राथमिक आरोग्य केंद्र आणि ३,००० लोकसंख्येस एक उपकेंद्र तर बिगर आदिवासी भागात ३०,००० लोकसंख्येस एक प्राथमिक आरोग्य केंद्र आणि ५,००० लोकसंख्येस १ उपकेंद्र अशी १,८२८ प्राथमिक आरोग्य केंद्र आणि १०,६६८ उपकेंद्रे कार्यरत आहेत. सन २०११ च्या जनगणनेनुसार महाराष्ट्राची शहरी भागाची लोकसंख्या ५.०८ कोटी आहे. तर सन २०२० साली शहरी भागाची अनुमानीत लोकसंख्या ५.९९ कोटी (४७ टक्के) होणार आहे. राज्यातील शहरी लोकसंख्येचे प्रमाण झपाटयाने वाढत आहे व ते लवकरच एकूण लोकसंख्येच्या ५० टक्केपेक्षा जास्त होणार आहे. परंतु शहरी भागामध्ये त्याप्रमाणात प्राथमिक आरोग्य सेवेमध्ये वाढ होत नाही. त्यामुळे लेप्टोस्पायरोसीस , स्वाईनफल्यू, डेंगी, ताप तसेच सध्या सुरु असलेली कोविड-१९ या आजाराची साथीचा प्रादुर्भाव शहरी भागात वाढत आहे. उदा. दि.६.६.२०२० अखेर राज्यात आढळलेल्या ८२,९६८ कोविड-१९ पैकी ७५,८४२ (९१ टक्के) रुग्ण हे महानगर क्षेत्रातील आहेत.

सार्वजनिक आरोग्य विभागाच्या अंतर्गत आयुक्त, आरोग्य सेवा यांच्या अधिपत्याखाली संचालक, आरोग्य सेवा-१, मुंबई व संचालक, आरोग्य सेवा-२, पुणे ही दोन संचालक स्तरावरील पदे कार्यरत आहेत. सदर दोन संचालक प्रामुख्याने राज्यातील ग्रामीण भागात आरोग्य सेवा पुरविण्याबाबतचे काम पाहतात. राज्याच्या ग्रामीण भागामध्ये बहुविविध आरोग्य सेवकामार्फत प्रत्येक घरातील लाभार्थ्याची नोंदणी करुन व प्रत्यक्ष संपर्क साधून सेवा दिली जाते. त्यामुळे ग्रामीण भागात

दोन आरोग्य संस्थांमधील अंतर जास्त असूनही आणि शिक्षणाचे प्रमाण कमी असूनही आरोग्य सेवा दिली जाण्याचे प्रमाण जास्त आहे. शहरी भागामध्ये राष्ट्रीय नागरी अभियानातंर्गत अशी रचना तयार केली जात आहे. शहरी भागामध्ये राज्य सरकारची, महानगरपालिकांची आणि खाजगी सेवा देणारी रुग्णालये आहेत परंतु प्राथमिक स्वरूपाच्या आणि प्रतिबंधात्मक आरोग्य सेवा देण्यासाठी ग्रामीण भागात उपलब्ध असणारी सक्षम यंत्रणा शहरी भागात उपलब्ध नाही. शहरातील सुशिक्षीत कुटुंबे रुग्णालयात जाऊन लसीकरण, गरोदरपणातील तपासण्या इ. सेवा घेतात परंतु चाळी, झोपडपटया इ. लोकवस्त्यामधील कुटुंबे स्वत:हून अशा सेवा घेत नाहीत. त्यांची नोंदणीकरुन त्यांना सेवा देणारी यंत्रणा शहरी भागात कार्यरत नाही. त्यामुळे शहरातील अशा भागातील अर्भक मृत्यू दर , माता मृत्यू दर हा ग्रामीण भागापेक्षाही जास्त असल्याचे आढळून आले आहे.

सार्वजनिक आरोग्याच्या दृष्टीने महत्वाच्या आजारांचा प्रतिबंध करण्यासाठी व उपचारासाठी राज्य शासन आणि केंद्र सरकार यांच्यातर्फे वेगवेगळया योजना / उपचारपध्दती / लस इ. जनतेस उपलब्ध करुन दिल्या जातात. शहरी भागातील विशेषत: महानगर भागातील क्षेत्रातील स्थानिक स्वराज्य संस्थामार्फत आरोग्य सेवा स्वतंत्र पणे दिल्या जात असल्यामुळे आणि या यंत्रणांचा सार्वजनिक आरोग्य विभागाशी समन्वय होत नसल्यामुळे राष्ट्रीय आरोग्य कार्यक्रम इ. योजना शहरी भागामध्ये सर्व लाभार्थ्यापर्यंत पोहचत नाहीत व त्यामुळे कनिष्ठ मध्यम वर्ग व गरीब व्यक्ती शासनाच्या आरोग्य सेवा पासून वंचित राहतात. शहरी व ग्रामीण भागातील आरोग्य यंत्रणेने एकत्रित पणे व समन्वयाने कार्यवाही केल्यास त्याचे चांगले परिणाम दिसून येतील. सध्या शहरामधील गर्दी , पाणी पुरवठा , कचरा, राहणीमान इ. कारणांमुळे डेंगी ताप, विषमज्वर, कावीळ, लेप्टोस्पयोरीस, कोविड-१९ यासारखे आजार मोठ्याप्रमाणात आढळतात. शहराच्या जवळपासच्या ग्रामीण भागातील नागरिक दैनंदिन रोजगार व कामासाठी शहरावर अवलंबून असल्यामुळे त्यांनाही हे आजार होतात.शहरातील आरोग्य यंत्रणा नगर विकास विभागाकडील स्थानिक स्वराज्य संस्थाकडे तर ग्रामीण भागातील आरोग्य यंत्रणा सार्वजनिक आरोग्य विभागाकडे असल्यामुळे आजार नियंत्रणामध्ये समन्वयासाठी

अडचणी येतात. अशावेळी शहरी व ग्रामीण भागातील आरोग्य यंत्रणेने एकत्रितपणे व समन्वयाने निरंतर कार्यवाही केल्यास चांगले परिणाम दिसून येतील.

राज्यात राबविण्यात येणारे सार्वजनिक आरोग्याच्या दृष्टीने महत्वाचे आरोग्य कार्यक्रम तसेच राज्याची सार्वजनिक आरोग्य सेवा एकत्रितपणे काम करावी आणि ग्रामीण व शहरी भागातील सार्वजनिक आरोग्याचे प्रश्न एकाच पध्दतीने आणि समन्वयाने हाताळता यावे. लसीकरण, साथरोग नियंत्रण इ. आरोग्य विषयक कार्यक्रम प्रभावीपणे राबविण्यासाठी स्थानिक स्वराज्य संस्थाना मार्गदर्शन करण्याकरीता पदे निर्माण करण्याच्या प्रस्तावास मंत्रिमंडळाने, दि.२६ ऑगस्ट, २०२० च्या क्र.३५ च्या बैठकीत दिलेल्या मंजूरीनुसार आवश्यक पदे निर्माण करण्यास मान्यता देण्यातबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचारधीन होता. यासंदर्भात पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

राज्यातील शहरी भागातील नागरीकांसाठी लसीकरण, साथरोग नियंत्रण तसेच त्यावरील प्रतिबंधात्मक उपाययोजना इ. आरोग्य विषयक कार्यक्रम अधिक परिणामकारकतेने राबविण्यासाठी तसेच आरोग्य विभाग व स्थानिक स्वराज्य संस्था यांच्यामध्ये समन्वय साधून त्यांना अशा कार्यक्रमाच्या अंमलबजावणीबाबत सर्व प्रकारचे तांत्रिक मार्गदर्शन करण्यासाठी राज्यातील शहरी भागासाठी खालील ७ पदांची निर्मिती करण्यास मान्यता देण्यात येत आहे. :-

| अ.क्र. | पदनाम व संवर्ग | वेतनश्रेणी | नियमित पदे |
|---|---|---|---|
| १ | संचालक, आरोग्य सेवा (शहरी) (महाराष्ट्र वैद्यकिय व आरोग्य सेवा, गट-अ , अतिरिक्त संचालक संवर्ग) | एस-२७,११८५००-२१४१०० | १ |
| २ | उपसंचालक, आरोग्य सेवा (शहरी) (महाराष्ट्र वैद्यकिय व आरोग्य सेवा, गट-अ, उपसंचालक संवर्ग) | एस-२५,७८८००-२०९२०० | २ |
| ३ | सहाय्यक संचालक, आरोग्य सेवा (शहरी) (महाराष्ट्र वैद्यकिय व आरोग्य सेवा, गट-अ,जिल्हा आरोग्य अधिकारी संवर्ग) | एस-२३,६७७००-२०८७०० | ४ |
| | | **एकूण पदे** | **७** |

२. संचालक, आरोग्य सेवा (शहरी) या पदाची कार्यकक्षा तसेच कर्तव्य व जबाबदाऱ्या खालीलप्रमाणे पुढील प्रमाणे राहतील.

- शहरी भागामध्ये प्राथमिक आरोग्याच्या सेवांचे बळकटीकरण करण्यासाठी स्थानिक स्वराज्य संस्थांशी समन्वय ठेवणे.
- महानगरपालिका व नगरपालिका कार्यक्षेत्रातील आरोग्य सेवा आणि सर्व राष्ट्रीय आरोग्य कार्यक्रमाची अधिक परिणामकारकतेने अंमजबजावणी करणे, नियमितपणे देखभाल , परिक्षण संनियंत्रण करणे व आढावा घेणे.
- ज्या स्थानिक स्वराज्य संस्थांच्या नागरी कार्यक्षेत्रामध्ये आरोग्य सेवेचे काम कमी असल्यास त्याबाबत आयुक्त, आरोग्य सेवा , प्रधान सचिव (सार्वजनिक आरोग्य विभाग) आणि प्रधान सचिव (नगरविकास विभाग) यांच्या निदर्शनास आणणे व त्यामध्ये सुधारणा करण्यासाठी उपाययोजना सुचविणे.
- साथरोग नियंत्रण कार्यक्रम अधिक परिणामकारकतेने राबविणे.
- आरोग्य सेवा, संचालक , स्थानिक स्वराज्य संस्था व नगरविकास विभाग यांच्यामध्ये समन्वय ठेवणे.

संचालक, आरोग्य सेवा (शहरी) यांच्या अधिनस्त पुढीलप्रमाणे तांत्रिक अधिकारी असतील.

| अ.क्र. | पदनाम | कामांची विभागणी |
|---|---|---|
| १ | उपसंचालक (शहरी) | राष्ट्रीय आरोग्य कार्यक्रम |
| २ | उपसंचालक (शहरी) | संसर्गजन्य रोग नियंत्रण |

उपसंचालक, आरोग्य सेवा (शहरी) यांच्या अधिनस्त पुढीलप्रमाणे तांत्रिक अधिकारी असतील.

| अ.क्र. | पदनाम | कामांची विभागणी |
|---|---|---|
| १ | सहायक संचालक (शहरी) | कुटुंब कल्याण व लसीकरण |
| २ | सहायक संचालक (शहरी) | इतर आरोग्य कार्यक्रम |
| ३ | सहायक संचालक (शहरी) | जलजन्य / किटकजन्य आजार |
| ४ | सहायक संचालक (शहरी) | इतर सांसर्गिक / असांर्गिक आजार |

संचालक, आरोग्य सेवा, (शहरी) हे प्रधान सचिव, नगरविकास-२, नगर विकास विभाग, मंत्रालय यांच्या अधिनस्त व त्यांच्यावर तांत्रिक नियंत्रणाखाली काम करतील. तर प्रशासकिय नियंत्रण आयुक्त, आरोग्य सेवा यांचे राहील. तसेच संचालक,आरोग्य सेवा (शहरी) हे आयुक्त, आरोग्य सेवा, संचालक-१/२ आरोग्य संचालनालय यांच्या मार्गदर्शनानुसार काम करतील. संचालक, आरोग्य सेवा (शहरी) यांना लागणारा आवश्यक लिपीकवर्गीय कर्मचारी वर्ग, वाहने, कार्यालय व इतर सर्व सुविधा मा.मुख्य सचिव निर्देश देतील त्याप्रमाणे नगरविकास / आरोग्य विभागामार्फत पुरविण्यात येईल. याबाबतचा प्रस्ताव दोन्ही विभाग मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील उच्चाधिकार समितीकडे स्वतंत्रपणे सादर करतील.

३. सदर पदांचे कामकाज हातळण्याकरीता कार्यालयाचे ठिकाण याबाबतचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

४. सदर पदांच्या कर्तव्य ,जबाबदाऱ्या व नियुक्ती / पदोन्नती याबाबत सेवाप्रवेश नियमांमध्ये आवश्यक त्या सुधारणा करण्याबाबत आयुक्त, आरोग्य सेवा यांनी याबाबतचा प्रस्ताव तातडीने शासनास सादर करावा.

५. सदर प्रस्तावातील खर्च खालील लेखाशीर्षाखाली सन २०२०-२१ व त्यानंतरच्या वर्षात मंजूर केलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

मागणी क्रमांक-आर-१

२२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य
०१ - नागरी आरोग्य सेवा-विषमचिकित्सा
००१ - संचालन व प्रशासन,
(०१) - आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई (अनिवार्य) (२२१० ००९३)
०१ - वेतन

६. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक-१८३/२०२०/व्यय-१३,दिनांक ११.०६.२०२० अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००८२४१२५८२४७४१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Roshani Dinesh Kadam Patil
DN: CN = Roshani Dinesh Kadam Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Public Health Department
Date: 2020.09.15 16:42:39 +05'30'

**(रो.दि.कदम-पाटील)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन,मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई.
३. मा.मंत्री (आरोग्य) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई.
४. मा.राज्यमंत्री (आरोग्य) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई.
५. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय,मुंबई.
६. सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
७. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई.
८. महालेखापाल (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), , महाराष्ट्र १/ २, मुंबई/ नागपूर.
९. प्रधान सचिव, वैद्यकिय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०.प्रधान सचिव, नगर विकास विभाग, , मंत्रालय,मुंबई.
११.आयुक्त, आरोग्य सेवा , आरोग्य भवन, मुंबई.
१२.सर्व विभागीय आयुक्त
१३.सर्व जिल्हाधिकारी
१४.सर्व महानगरपालिका आयुक्त
१५.सर्व मुख्य अधिकारी,नगरपालिका / नगरपरिषद
१६.संचालक-१, आरोग्य सेवा, मुंबई.
१७.संचालक-२, आरोग्य सेवा, पुणे.
१८. सह संचालक, आरोग्य सेवा, संसर्गजन्य आजार/कुटुंब कल्याण, पुणे.
१९. उप संचालक, आरोग्य सेवा, सर्व मंडळे
२०.सर्व जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रुग्णालये.
२१.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
२२.सर्व जिल्हा आरोग्य अधिकारी.

२३.वित्त विभाग (कार्यासन- व्यय १३), मंत्रालय, मुंबई.

२४.नियोजन विभाग (कार्यासन १४७२),मंत्रालय, मुंबई.

२५.सर्व मंत्रालयीन विभाग ( सर्व विभागांना विंनती करण्यात येते की, त्यांनी त्यांच्या नियंत्रणाखालील विभाग प्रमुखांना व कार्यालयीन प्रमुखांना तसेच सर्व क्षेत्रीय कार्यालयांना सदर शासन निर्णय अग्रेषित करुन अवगत करावे.)

२६.सार्वजनिक आरोग्य विभाग (कार्यासन- आरोग्य ३अ, आरोग्य ४, सेवा १,सेवा २,सेवा ३, सेवा ५, अर्थसंकल्प ).

२७.निवडनस्ती (आरोग्य ३)